आदर्श आचारसंहिते संदर्भात छाननी समिती गठीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन,**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : एमसीसी - २०१७ /प्र.क्र. ६६/१७/३३.**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २४ जानेवारी, २०१७.

**संदर्भ** :- भारत निवडणूक आयोगाचे पत्र क्र. ४३७/६/पीओएल/एलईटी/एफयुएन/२०१७-सीसीएस, दिनांक ९ जानेवारी, २०१७.

**शासन परिपत्रक :**

भारत निवडणूक आयोगाने संदर्भाधीन पत्रान्वये दिलेल्या सूचना विचारात घेवून लोकसभा / विधानसभा सार्वत्रिक/ पोट निवडणूक आणि पदवीधर/ शिक्षक आणि स्थानिक प्राधिकारी मतदारसंघाची विधानपरिषद द्विवार्षिक निवडणूक /पोटनिवडणूक आदर्श आचारसंहिते संदर्भातील प्रस्तावांची छाननी करण्यासाठी खालील प्रमाणे छाननी समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | |
|---|---|
| अ) मुख्य सचिव | - अध्यक्ष |
| ब) प्रस्तावाशी संबंधित विभागाचे प्रधान सचिव /सचिव | - सदस्य |
| क) राज्याच्या समन्वय विभागाचे प्रधान सचिव /सचिव | - सदस्य |

२. आदर्श आचारसंहितेसंदर्भातील प्रस्तावाबाबत करावयाच्या कार्यवाही संदर्भात छाननी समितीची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे असेल :-

I) छाननी समिती आदर्श आचारसंहितेच्या आयोगाच्या पोर्टलवर उपलब्ध असलेल्या सूचना / स्पष्टीकरण लक्षात घेवून भारत निवडणूक आयोगाकडे मुख्य निवडणूक अधिकाऱ्यांमार्फत प्रस्ताव पाठविण्यापूर्वी छाननी करेल.

II) छाननी समिती छाननी करुन प्रस्तावाबाबत शिफारस करेल.

III) छाननी समितीने शिफारस केलेले प्रस्ताव संपूर्ण तपशील आणि तातडीबाबतची टिपणी यासह मुख्य निवडणूक अधिकारी यांचेकडे सादर करण्यात येतील.

IV) मुख्य निवडणूक अधिकारी छाननी समितीने शिफारस केलेले प्रस्ताव त्यांच्या अभिप्रायांसह भारत निवडणूक आयोगाकडे पाठवतील.

३. आदर्श आचारसंहितेसंदर्भातील प्रस्तावाबाबत विभागांनी पुढील प्रमाणे दक्षता घ्यावी :-

अ) राज्यातील सर्व विभागांनी कोणताही संदर्भ थेट भारत निवडणूक आयोगास करु नये.

ब) शासनाच्या संबंधित विभागांनी मुळ नस्ती मुख्य निवडणूक अधिकारी यांचे कार्यालयाकडे सादर करु नये. छाननी समितीमार्फत स्वयंस्पष्ट प्रस्ताव पाठवावा.

क) भारत निवडणूक आयोगास संदर्भ निकाली काढण्यास काही कालावधी आवश्यक असल्याने अंतिम क्षणी प्रस्ताव पाठविणे टाळावे.

४. उपरोक्त सूचना लक्षात घेवून प्रशासकीय विभागांनी उचित कार्यवाही करावी अशा सूचना या परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२४१५०८४४१३०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Anil Nansing Valvi

Digitally signed by Anil Nansing Valvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a7c28200f6d58206324d8086ffcf99758c115aada508a7437f2ae5d9fa1ba5d, cn=Anil Nansing Valvi
Date: 2017.01.24 16:13:24 +05'30'

**(अ. ना. वळवी)**
**उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रति:-**

सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग.

**प्रत :-**

१) विभागीय आयुक्त, (सर्व)
२) जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी (सर्व)
३) उप जिल्हा निवडणूक अधिकारी (सर्व)